क्र.मावजसं/आधुनिकीकरण/२०११/
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : २१-१२-२०११

## कार्यालयीन आदेश

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामध्ये माहिती-तंत्रज्ञान संचालनालयाच्या मदतीने खालील प्रकल्प राबवावयाचे आहेत. मागील काही दिवसात माहिती व जनसंपर्क महासंचालनालयात आणि माहिती तंत्रज्ञान संचालनालय यांच्यामध्ये नागपूर येथे सविस्तर चर्चा झाल्यानंतर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

**१. प्रशिक्षण**

महासंचालनालयातील संचालक ते सहायक संचालक या श्रेणीतील सर्व राजपत्रित अधिकाऱ्यांना प्रशिक्षण आवश्यक आहे. विशेषत: Open Office, IT Audit And Security, Website Management, Networking Management, Use of Photoshop and other softwares in preparing advertisements, Use of Flash and Photoshop in Inhouse activities अशा क्षेत्रांमध्ये प्रशिक्षणाची आवश्यकता आहे. हे प्रशिक्षण माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत देण्यात येईल.

**२. तात्काळ व प्रभावी संपर्कासाठी लॅपटॉप**

शासकीय योजनांची माहिती माध्यमांना गतिमान पद्धतीने पाठविण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या अधिनस्त जिल्हा माहिती कार्यालयांना ४० अधिकाऱ्यांना प्रत्येकी एक याप्रमाणे अत्याधुनिक पद्धतीचे (ॲसर, विन्डोज ७) लॅपटॉप /टॅबलेटस माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या अनुदानातून देण्यात येतील.

**३. दुर्मिळ छायाचित्रे आणि ऐतिहासिक माहितीपटांसाठी गॅलरी**

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतरच्या ६० वर्षातील महत्त्वाच्या घटना-घडामोडींची दुर्मिळ छायाचित्रे आणि ऐतिहासिक माहितीपट, समाचारचित्रे महासंचालनालयाकडे उपलब्ध आहेत. हा अनमोल ठेवा खराब होऊ नये म्हणून सर्व छायाचित्रांचे डिजिटलायझेशन आणि व्हिडिओ रेस्टोरेशनचे काम महासंचालनालयाने हाती घेतले असून सध्या ते अंतिम टप्प्यात आहे.

हा ठेवा जतन करण्यासाठी राज्याच्या स्टेट डेटा सेंटरमध्ये जागा उपलब्ध करुन देण्यात येत आहे. तसेच माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या वेबसाईटवर याची लिंक देण्यात येईल. ही दुर्मिळ छायाचित्रे विषयानुरुप तसेच छोट्या आकारात वेबसाईटवर उपलब्ध असतील तसेच एखाद्या विशिष्ट प्रसंगाचे छायाचित्र शोधण्याची सुविधाही या ठिकाणी उपलब्ध असेल. विहित शुल्क वेबसाईटवर ऑनलाईन पद्धतीने भरल्यावर ही छायाचित्रे मूळ आकारात संबंधितांना डाऊनलोड करुन घेता येतील. माहितीपटांसाठीही अशाच प्रकारची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येईल. **(संस्था - महाऑनलाईन)**

४. **लोकराज्यच्या जुन्या प्रतींचे डिजिटलायझेशन**

गेल्या पन्नास वर्षात प्रसिद्ध झालेल्या लोकराज्यच्या सुमारे एक हजार अंकांच्या डिजिटलायझेशनचे तसेच त्यासाठी वेबसाईटवर जागा उपलब्ध करून देण्याचे काम माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत करण्यात येईल. जसजसे अंकांचे डिजिटलायझेशन होत जाईल तसतसे हे अंक माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात येतील.

**(संस्था - महाऑनलाईन)**

५. **लोकराज्य मासिकाची ऑनलाइन वर्गणी**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या वेबसाईटवरून वाचकांना ऑनलाईन वर्गणी (नवीन वर्गणीदार तसेच वर्गणीचे नूतनीकरण) भरण्यासाठी सुविधा उपलब्ध करून देण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

६. **महत्वाच्या उपक्रमांसाठी फेसबुक पेज**

महासंचालनालयाची वेबसाईट, महान्यूज तसेच लोकराज्य मासिकासाठी फेसबुक पेज तयार करण्यात येईल. जेणेकरुन या उपक्रमांना नेटीझन्सचा अधिकाधिक प्रतिसाद मिळेल. त्याचबरोबर शासनाचे उपक्रम, ध्येयधोरणे आणि योजनांची व्यापक प्रमाणावर प्रसिद्धी होईल.

७. **एफ.टी.पी. (File Transfer Protocol)**

राज्यातील महत्त्वाच्या घटना, कार्यक्रम, मान्यवरांच्या दौ-यांचे चित्रीकरण, बातम्या, छायाचित्रे इत्यादी मुख्यालयामार्फत वाहिन्यांना तातडीने उपलब्ध होण्याच्या दृष्टिकोनातून FTP च्या वापराबाबत सध्या महासंचालनालयामार्फत कार्यवाही सुरु आहे.

राज्याच्या डेटा सेंटरमध्ये यासाठी जागा उपलब्ध करुन देण्यात येत आहे. ज्यामुळे सर्व अधिनस्त कार्यालये तसेच वाहिन्या यांच्यामध्ये चित्रीकरण व बातम्यांच्या अनुषंगाने गतिमान पद्धतीने आदान-प्रदान होऊ शकेल.

८. **जाहिरात वितरणासाठी केंद्रिय आज्ञावली (Centralized Software)**

राज्यातील सर्व कार्यालयांसाठी जाहिरात वितरणाचे एकत्रित असे केंद्रिय पद्धतीचे सॉफ्टवेअर विकसित करण्यात येईल. या सॉफ्टवेअरद्वारे रोटेशन पद्धतीने वर्तमानपत्रांची निवड झाल्यानंतर वेबसाईटद्वारे संबंधित वर्तमानपत्रांना वितरण आदेश व जाहिरातीचा मजकूर पाठविता येणे शक्य होईल. अशाप्रकारे हे सॉफ्टवेअर व वेबसाईट एकमेकांना जोडण्यात येतील (linking). तसेच माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाची सर्व कार्यालये दैनंदिन स्तरावर वितरीत झालेल्या जाहिराती वेबसाईटवर अपलोड करतील. **(संस्था - महाऑनलाईन)**

**९. maharashtra.gov.in या वेबसाईटवर सर्व अधिनस्त कार्यालयांसाठी ई-मेल पत्ते**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये एकमेकांशी dgipr.maharashtra.gov.in वरील ई-मेल पत्याद्वारे जोडण्यात येतील. **(संस्था -माहिती तंत्रज्ञान संचालनालय आणि स्टेट डेटा सेंटर टीम)**

त्याचबरोबर मुख्यालयातील सर्व संगणक इंट्रानेट तसेच इंटरनेट सेवेद्वारेही जोडली जातील. **(संस्था -माहिती तंत्रज्ञान संचालनालय)**

**१०. वायफाय कनेक्शन (मंत्रालय प्रेस रूम)**

मंत्रालयाच्या तळमजल्यावर असलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास तसेच प्रेस रुम येथे वायफाय जोडणीची सुविधा माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून घ्यावयाच्या काळजीबाबतही माहिती व तंत्रज्ञान संचालनालय एक छोटेसे प्रशिक्षण देईल. **(माहिती तंत्रज्ञान संचालनालय)**

**तसेच आधुनिक जगाशी संपर्कात राहण्याच्या दृष्टीने महासंचालनालयाच्या मुख्यालयातील सर्व संगणकांना सकाळी ९ ते १०.३० वेळात फेसबुक वापरण्याची सुविधा उपलब्ध करुन द्यावी. (माहिती तंत्रज्ञान संचालनालय)**

**११. जय महाराष्ट्र आणि दिलखुलास**

जय महाराष्ट्र आणि दिलखुलास (ऑडिओ व्हिज्युअल) कार्यक्रमांचे सर्व भाग सर्व्हरवर ठेवण्यात येतील तसेच महासंचालनायाच्या वेबसाईटवरुन लिंक देण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

**१२. अधिस्वीकृती पत्रिका**

अधिस्वीकृती पत्रिकेसाठीचे अर्ज यापुढे ऑनलाईन उपलब्ध करुन देण्यात येतील. तसेच अधिस्वीकृती पत्रिकाधारकांची माहितीही वेबसाईटवर देण्यात येईल. महासंचालनालयाच्या वेबसाईटवर याची लिंक देण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

**१३. जाहिरात यादीवर समावेश/ दरवाढ - श्रेणीवाढ**

जाहिरात यादीवर नव्याने समावेश करणे तसेच दरवाढ/श्रेणीवाढ करण्यासाठीचे सर्व अर्ज यापुढे ऑनलाईन स्विकारण्यासाठी महासंचालनाच्या वेबसाईटवर लिंक देण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

**१४. ऑन लाईन नियतकालिक (On Line Magzine)**

शासकीय कमचाऱ्यांच्या कला-गुणांना वाव मिळावा यासाठी ऑनलाईन नियतकालिक सुरु करण्यात येईल. याची लिंक महासंचालनालयाच्या वेबसाईटवरुन देण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

१५. **कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबी आणि माहितीचा अधिकार**

अधिकारी, कर्मचाऱ्यांची सर्व माहिती, जेष्ठता सूची, पदोन्नती, रिक्त जागांबाबतची माहिती तसेच माहितीचा अधिकार या बाबतची सर्व माहिती वेबसाईटवर टाकण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

१६. **एमआयएस**

सर्व अधिकाऱ्यांच्या कामात सुसूत्रता यावी यासाठी एमआयएस प्रणाली विकसित करण्यात येईल. १ फेब्रुवारीपासून सर्व उपसंचालक, जिल्हा माहिती अधिकारी आणि मंत्रालयातील अधिकारी यांना एमआयएसचे फॉर्म ऑनलाईन भरणे अनिवार्य राहिल. कोणत्याही परिस्थितीत टपालाने एमआयएस स्वीकारले जाणार नाही. **(महाऑनलाईन)**

१७. **वृत्तपत्रांची कात्रणे स्कॅन करुन ई-मेलद्वारे पाठविणे**

वर्तमानपत्रातील तसेच नियतकालिकांमधील महत्वाची कात्रणे संबंधित मंत्री/ सचिव/अधिकाऱ्यांना स्कॅन करुन ई-मेलद्वारे पाठविण्यासाठी माहिती तंत्रज्ञान विकसित करत असलेल्या डॅशबोर्डचा उपयोग करण्यात येईल. **(महाऑनलाईन)**

१८. **सर्व अधिनस्त कार्यालयांना MSWAN ची सुविधा**

राज्यातील महत्वाच्या कार्यक्रमांचे चित्रिकरण पाठविण्यासाठी राज्यातील सर्व अधिनस्त कार्यालयांना MSWAN ची जोडणी माहिती व तंत्रज्ञान विभागामार्फत करुन देण्यात येईल. **(माहिती तंत्रज्ञान संचालनालय)**

महासंचालनालयामध्ये उपरोक्त बाबींची अंमलबजावणी माहिती तंत्रज्ञान संचालनालय करेल. तसेच जून २०१२ पर्यंत माहिती तंत्रज्ञान संचालनालयामार्फत संपूर्ण तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देण्यात येईल.

हा कार्यालयीन आदेश संगणक संकेतांक 201112221021351235001 अन्वये www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत आहे.

(राजेश अग्रवाल)
सचिव (माहिती तंत्रज्ञान) तथा
महासंचालक (माहिती व जनसंपर्क)

प्रति

सर्व संबंधित अधिकारी व यंत्रणा